कोल्हापूर जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ लि. (गोकुळ) संघांवर शासन नियुक्त संचालक म्हणून नेमणूक करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एमएलके-२०१८/प्र.क्र.१०५/पदुम-१०

मंत्रालय, मुंबई-४०००३२

**तारीख: १९ जून, २०१८**

**वाचा :-** १) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाची क्र. सीएसएल-२०१६/प्र.क्र.१९/१३-स , दिनांक ६ /४/२०१६ व दि.१४/३/२०१७ ची अधिसूचना.

२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाचा महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० सन २०१८ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र. १५ दिनांक ८/६/२०१८

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० चे कलम ७३ अ अ अ मधील पोटकलम (२) मधील तरतुदींच्या अनुषंगाने सहकार पणन व वस्त्रोदयोग विभागाने दि.०६/०४/२०१६ व दि.१४/०३/२०१७ अन्वये अधिसूचना निर्गमित केलेल्या आहेत. तसेच सहकार विभागाने संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक ८/६/२०१८ रोजी अध्यादेश निर्गमित केलेला आहे. सदर अधिसूचनांनुसार व अध्यादेशानुसार ज्या सहकारी संस्थांना भागभांडवल, कर्ज, हमी, अनुदान, शासकीय जमीन या स्वरुपात किंवा इतर कोणत्याही स्वरुपात - मग ते रोख किंवा वस्तू रुपाने असो, शासनाचे सहाय्य असलेल्या गृहनिर्माण संस्था वगळून इतर संस्थेच्या बाबतीत संचालक मंडळामध्ये एक शासकीय अधिकारी जो सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था यापेक्षा कमी दर्जाचा नसेल अशा व्यक्तीस संचालक म्हणून नियुक्त करता येईल आणि एक खाजगी व्यक्ती जिला,ज्या प्रकारची सहकारी संस्था आहे, अशां सहकारी संस्थांशी संबंधित कार्यपध्दतीविषयी अनुभव असेल, तिला शासन नियुक्त संचालक म्हणून नेमता येईल, अशी तरतूद आहे.

महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मधील तरतूदीनुसार श्री.अनिलकुमार दिनकरराव यादव हे शैक्षणिक अर्हता व अनुभव हया पात्रता पूर्ण करीत असल्याने, कोल्हापूर जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ लि. ( गोकुळ ) संघांवर शासन नियुक्त संचालकाची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कोल्हापूर जिल्हा सहकारी दूध उत्पादक संघ लि. ( गोकुळ ) संघांच्या संचालक मंडळामध्ये शासन नियुक्त संचालक म्हणून श्री.अनिलकुमार दिनकरराव यादव, ता. शिरोळ, जिल्हा कोल्हापूर यांची नेमणूक करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१९१७१८१०१००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Tanbaji Uike

Digitally signed by Ashok Tanbaji Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87cfab3c12a61b33987277f837a341fb6c84ebe6d1bf10339d150649af95e5b8, cn=Ashok Tanbaji Uike
Date: 2018.06.20 12:38:07 +05'30'

(अ. ता. उईके)
उप सचिव , महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा मंत्री ( पदुम ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. राज्यमंत्री ( पदुम ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सचिव ( पदुम) , कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास , वरळी, मुंबई
६. सहनिबंधक, सहकारी संस्था ( दुग्ध ), वरळी, मुंबई
७. विभागीय उपनिबंधक, सहकारी संस्था ( दुग्ध) पुणे विभाग, पुणे
८. श्री. अनिलकुमार दिनकरराव यादव, ता. शिरोळ, जिल्हा कोल्हापूर
९. निवड नस्ती कार्यासन पदुम-१०